**शासकीय सेवकांना पदोन्नती संदर्भात मानीव दिनांक देण्याबाबत प्रकरण तपासणी अधिकाराबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-१०९३/प्र.क्र. २/९३/१२
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - ११ जून, १९९३.

**वाचा :-**

(१) शासन परिपत्रक, राजकीय आणि सेवा विभाग, क्रमांक एलआर - आयएनटी - १०५९- ६, दिनांक १० मार्च, १९६०.

(२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक - एसआरव्ही - १०६४-ड, दिनांक- २५ फेब्रुवारी, १९६५.

**शासन परिपत्रक**

शासन सेवेतील कर्मचारी / अधिकारी यांना पदोन्नतीच्या संदर्भात डावलले गेले असल्याचे निश्चित झाले तर त्यांना पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्याबाबत विचार करण्यात येतो. मानीव दिनांक देण्याबाबतची प्रकरणे वर नमूद केलेल्या परिपत्रकानुसार तपासावयाची असतात. वर नमूद केलेल्या दिनांक १० मार्च, १९६० च्या परिपत्रकातील तरतुदींप्रमाणे जर तात्पुरत्या ज्येष्ठता यादीच्या आधारे पदोन्नती दिली असेल आणि ती ज्येष्ठता यादी अंतिम केल्यानंतर त्या ज्येष्ठतेनुसार जर कनिष्ठ व्यक्तीला अगोदर नियमित स्वरुपाची पदोन्नती दिली असेल तर ज्येष्ठ व्यक्तीला पदोन्नतीचा मानीव दिनांक दिला जातो.

मात्र वेतन निश्चितीच्या फरकांचे लाभ दिले जात नाहीत. दिनांक २५ फेब्रुवारी, १९६५ च्या परिपत्रकातील तरतुदींच्या आधारे ज्येष्ठता यादीमधील ज्येष्ठ व्यक्तीला चुकीने अधिक्रमण करुन कनिष्ठ व्यक्तीला नियमित स्वरुपाची पदोन्नती दिली असेल तर मानीव दिनांक दिला जातो. या प्रकरणी ज्या व्यक्तीला मानीव दिनांक दिला असेल त्याला वेतननिश्चितीचे फायदे फरकासहित दिले जातात.

२. मानीव दिनांक देण्याबाबतची प्रकरणे मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी, सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभाग यांच्या परामर्शाने निकाली काढणे आवश्यक आहे. कारण अशा प्रकरणी एकाच पदाचे वेतन दोन व्यक्तींना देण्याची शक्यता निर्माण होत असते. तसेच

(कृ.मा.प.)

पदोन्नती नियमित स्वरुपाची नसेल तर मानीव दिनांक देण्याबाबतचा निर्णय घेणे अयोग्य असते. यामुळे मानीव दिनांक देण्याबाबतची प्रकरणे सखोल परिक्षणानंतर निकाली काढणे आवश्यक आहे. परंतु या विभागाच्या असे निदर्शनास आले आहे की, मानीव दिनांक देण्याबाबतची प्रकरणे विभाग प्रमुख स्तरावर तपासली जावून निर्णय घेतले जातात. हे निर्णय वर नमूद केलेल्या परिपत्रकातील तरतुदींप्रमाणे नसल्याचेही आढळून आले आहे. म्हणून मानीव दिनांक देण्याबाबतच्या प्रकरणी शासन आता असे आदेश देत आहे की, मानीव दिनांक देण्याबाबतचा प्रकरणे मंत्रालयीन विभागांनी परस्पर निकाली काढू नयेत, मंत्रालयीन विभागांनी अशा प्रकरणांची प्राथमिक छाननी करावी व याबाबतच्या प्रस्तावांना सामान्य प्रशासन विभाग आणि वित्त विभाग यांनी आवश्यक मंजूरी दिल्यानंतरच यासंबंधीचे आदेश निर्गमित करावेत.

३. सर्व मंत्रालयीन विभागांनी शासनाचे सदर आदेश त्याच्या अखत्यारीतील विभाग प्रमुख आणि कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणावेत. तसेच विभाग प्रमुख स्तरावर मानीव दिनांक देण्याबाबत जर यापूर्वी काही आदेश असतील तर ते आदेश या निर्णयानुसार अधिक्रमित ठरतील.

४. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही १०७६/१२ दिनांक २१ जून, १९८२ अन्वये ज्येष्ठता विनियम विहित करण्यात आले आहेत. त्यामधील नियम ५(१) मधील सक्षम प्राधिकारी याऐवजी आवश्यक ती दुरुस्ती करण्याची कार्यवाही वेगळी करण्यात येत आहे. तोपर्यन्त मानीव दिनांक प्रस्ताव या आदेशानुसार तपासण्यात यावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य. मा. जोशी
उप सचिव,महाराष्ट्र शासन

C:\Desk 12\G.R\GR-11-06-93